**स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत केंद्र हिश्श्याचे अनुदान राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्वमअ-२०१७/प्र.क्र.५४/नवि-३४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २७ एप्रिल, २०१७.

<u>वाचा:</u>

१) केंद्र शासनाच्या नगरविकास मंत्रालयाचे आदेश क्रमांक १/७/२०१५-SBM-I, दिनांक १२ एप्रिल, २०१७. (एकूण ३ आदेश)

२) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: स्वभाअ-२०१५/प्र. क्र. २३/नवि-३४, दिनांक १५.०५.२०१५

**<u>शासन निर्णय:</u>**

देशातील सर्व शहरे पूर्णपणे स्वच्छ, निरोगी आणि राहण्यायोग्य करणे आणि सर्व नागरिकांना स्वच्छ व चांगले आरोग्य आणि पर्यावरण मिळावे तसेच देशातील सर्व सांविधानिक शहरांना स्वच्छतेची आणि या शहरामधील नागरीकांना घरगुती शौचालयांची सुविधा उपलब्ध करून देणे, या उद्देशाने केंद्र शासनाने “स्वच्छ भारत अभियान (नागरी)” ची अंमलबजावणी सुरु केली आहे. या अभियानाच्या धर्तीवर राज्यामध्ये संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये “स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)” राबविण्यात येत आहे.

२. केंद्र शासनाने स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात राज्यासाठी वैयक्तीक घरगुती शौचालय बांधकाम, माहिती, शिक्षण, संवाद व जनजागृती तसेच क्षमता बांधणी व प्रशासकीय व कार्यालयीन खर्चाकरिता उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक १ येथील आदेशान्वये एकूण रुपये ४०.०० कोटीचा निधी वितरीत केला आहे. स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त सदर निधी रुपये ४०.०० कोटी राज्यातील नागरी स्वराज्य संस्थांना पुढील प्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे. सदरचा खर्च संबंधित लेखाशिर्षासमोर दर्शविल्याप्रमाणे त्या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदी मधून भागविण्यात यावा.

(रूपये कोटीत)

| अ. क्र. | लेखाशिर्ष | वैयक्तिक घरगुती शौचालयासाठी वितरीत केलेला निधी | माहिती, शिक्षण व संवाद या घटकासाठी वितरीत केलेला निधी | क्षमता बांधणी तसेच प्रशासकीय व कार्यालयीन खर्च या घटकासाठी वितरीत केलेला निधी | **एकूण** |
|---|---|---|---|---|---|
| १ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (७६) स्वच्छ भारत अभियानासाठी महानगरपालिकांना सहाय्य (केंद्र हिस्सा ७५%), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७५२) योजनांतर्गत | १०.००/- (रूपये दहा कोटी) | ०.५०/- (रुपये पन्नास लक्ष) | ०.५०/- (रुपये पन्नास लक्ष) | **११.००/- (रुपये अकरा कोटी)** |
| २ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००) (७८) स्वच्छ भारत अभियानांतर्गत नगरपरिषदांना सहाय्य (केंद्र हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७७९) योजनांतर्गत | १०.००/- (रूपये दहा कोटी) | ३.५०/- (रुपये तीन कोटी पन्नास लक्ष ) | ३.५०/- (रुपये तीन कोटी पन्नास लक्ष ) | **१७.००/- (रुपये सतरा कोटी)** |
| ३ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९३, नगरपंचायतींना सहाय्य, (००) (०३) स्वच्छ भारत अभियानांतर्गत नगरपंचायतींना सहाय्य (केंद्र हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७९७) योजनांतर्गत | १०.००/- (रूपये दहा कोटी) | १.००/- (रुपये एक कोटी) | १.००/- (रुपये एक कोटी) | **१२.००/- (रुपये अकरा कोटी)** |

३. सदर निधी आहरित करण्यासाठी राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रकमेचे देयक तयार करून ते अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्याकडे तात्काळ सादर करून सदर निधी आहरित करून धनादेश प्राप्त करून घेण्यात यावा. सदर निधीचे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानिहाय वाटप शासन स्वतंत्र आदेशान्वये करून देईल, त्यानुसार या निधीचे वितरण संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना करण्याची कार्यवाही राज्य अभियान संचालकांनी करावी.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/ अर्थ-३ दिनांक १८ एप्रिल, २०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/ अर्थ-३ दिनांक १८ एप्रिल, २०१७ अन्वये ३१, वेतनेत्तर सहाय्यक अनुदाने या बाबी खालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ पैकी ७ अ, ७ ब, ८, १०, ११, १२, १३, १४, १५, १६, १७, २० या प्रकरणी लागू नाही. तसेच परिच्छेद ९, १८, १९, २१ मध्ये नमूद अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

६. शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं २०१७/प्र.क्र. ७५/अर्थ-३ दिनांक १८ एप्रिल, २०१७ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक १, २, ३, ५, ६, ७ या प्रकरणी लागू नाही. तसेच सदर परिशिष्टातील अनुक्रमांक ४ बाबत नमुद करण्यात येते कि, ही योजना केंद्र पुरस्कृत बाह्य सहाय्यित योजना नाही, तथापि केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्याची खात्री वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक: अनौ-२१५/अर्थोपाय, दिनांक २१/०४/२०१७ अन्वये करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी केंद्र शासनाच्या हिश्श्याच्या समरूप राज्य शासनाच्या हिश्श्याच्या मर्यादेत आहे.

७. शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं २०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३ दिनांक १८ एप्रिल, २०१७ रोजीच्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ३ च्या अनुषंगाने नमूद करण्यात येते कि, सदर योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये कसलाही बदल करण्यात आलेला नाही. तसेच सदर दिनांक १८ एप्रिल, २०१७ रोजीच्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ संदर्भातील तपासणी सुचीमधील अनुक्रमांक १ ते ५ मध्ये नमुद करण्यात आलेल्या अटींची पुर्तता होत आहे. तसेच सदर अनुक्रमांक ९ संदर्भातील तपासणी सुचीमधील अनुक्रमांक ५ ते १० या प्रकरणी लागू नाही. तसेच शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७ मधील लागू असलेल्या उर्वरित सर्व अटींची पूर्तता होत आहे.

८. शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं २०१७/प्र.क्र. ७५/अर्थ-३ दिनांक १८ एप्रिल, २०१७ मधील ७ क अन्वये ३१ वेतनेत्तर सहायक अनुदाने या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत. सदर शासन निर्णयान्वये रुपये ४०.०० कोटी निधी मंजूर करण्यात येत आहे.

९. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) यांच्याकडून मागील ३ महिन्यापूर्वी वितरीत केलेला निधी खर्च झाल्याबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झालेले आहे. तसेच उपरोक्त नमूद लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. केंद्र शासन पुरस्कृत योजनेसाठी केंद्र शासनाच्या हिश्श्याचा निधी वितरीत करावयाचा असल्याने त्यामधून स्थानिक स्वराज्य संस्थांकडून येणे असलेली रक्कम समायोजित करता येत नाही.

१०. सदरचा शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांकः अनौ-२१५/अर्थोपाय, दि. २१/४/२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२७१५००५७०६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1634ab95abe4652ec2433f0ccd505c20ea3e7ecad3bfcb55d49ad9dbd0fe5e, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2017.04.27 15:00:49 +05'30'

**(सुधाकर ज्ञा. बोबडे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा .मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा .राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, वित्त, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-२, नागपूर.
६. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय, मुंबई.
८. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
९. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
११. अधिदान व लेखाधिकारी, फोर्ट, मुंबई.
१२. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे, मुंबई.
१३. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१४. मुख्य लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१५. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१६. निवडनस्ती, नवि-३४.